केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण योजनेंतर्गत सन २०१८-१९ मधील केंद्र हिश्श्यापोटी रू.२८२२.०० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी रु.१८८१.३४ लक्ष अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-०६१८/प्र.क्र.३४६/आरोग्य-७**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ७ जानेवारी, २०१९.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८.

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. G.२७०३४/१३२/२०१८-NHM-Finance/I, दिनांक २७ जुलै, २०१८.

३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-०६१८/प्र.क्र.३४६/आरोग्य-७, दिनांक ३० जुलै, २०१८.

४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः एनएचएम-०६१८/प्र.क्र.३४६/आरोग्य-७, दिनांक २८ सप्टेंबर, २०१८.

५) संचालक, वित्त व लेखा, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे पत्र क्र.राआसोम/एफएमजी/ कें. रा.हि./७०९६७-९७४/२०१८-१९, दिनांक २९ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

ग्रामिण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करून देण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामिण आरोग्य अभियान सुरू केले आहे. सदर योजनेअंतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम (Reproductive & child Health), नियमित लसीकरण, मिशन फ्लेक्सीपुल, पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व पल्स पोलियो लसीकरण इत्यादी आरोग्य सेवा देण्यात येतात. त्या अनुषंगाने राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमा करीता सर्वसाधारण वर्गवारीसाठी (General) ६०% केंद्र हिस्सा त्यास समरुप ४०% राज्य हिश्श्याचे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

त्यानुषंगाने संदर्भ क्र.१ येथील शासन परिपत्रकातील परिच्छेद-४ मधील तरतुदीनूसार याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमा करीता सर्वसाधारण वर्गवारीसाठी (General) केंद्र शासनाचा ६० टक्के हिस्सा याकरिता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने रु.११३१८४.३६ लक्ष एवढी तरतुद अर्थसंकल्पित केलेली आहे आणि राज्य शासनाचा ४० टक्के हिस्सा याकरिता मूळ आणि पुरवणी मागणीद्वारे सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात राज्य शासनाने रु.७११३३.९५ लक्ष एवढी तरतुद अर्थसंकल्पित केलेली आहे. त्यापैंकी केंद्र शासनाचा पहिला हप्ता रु.३९२९४.०० लक्ष (रुपये तीनशे ब्याण्णव कोटी चौऱ्याण्णव लक्ष फक्त) इतकी रक्कम ६०% केंद्र हिस्सा म्हणून तर त्यास समरुप ४०% म्हणजेच रु.२६१९६.०० लक्ष (रुपये दोनशे एकसष्ट कोटी शहाण्णव लक्ष फक्त) इतका राज्य हिस्सा राज्य आरोग्य सोसायटीस वरील संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. तसेच, केंद्र शासनाच्या दुसऱ्या हफ्त्यापोटी केंद्र हिस्सा रु. ७००३.०० लक्ष (रु. सत्तर कोटी तीन लक्ष फक्त) व त्यास समरुप राज्य हिश्श्यापोटी राज्य हिस्सा रु. ४६६८.६७ लक्ष (रु. सेहेचाळीस कोटी अडुसष्ट लक्ष सदुसष्ट हजार फक्त) इतका निधी राज्य आरोग्य सोसायटीस क्र.४ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. तिसऱ्या हफ्त्यापोटी केंद्र हिस्सा रु.२८२२.०० लक्ष (रु. अठ्ठावीस कोटी बावीस लक्ष फक्त) व त्यास समरुप राज्य हिश्श्यापोटी राज्य हिस्सा रु.१८८१.३४ लक्ष (रु. अठरा कोटी एक्याऐंशी लक्ष चौतीस हजार फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सदरहू योजने अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमा करीता सर्वसाधारण वर्गवारीसाठी (General) केंद्र शासनाचा तिसरा हप्ता रु.२८२२.०० लक्ष (रुपये अठ्ठावीस कोटी बाबीस लक्ष फक्त) इतकी रक्कम ६०% केंद्र हिस्सा म्हणून तर त्यास समरुप ४०% म्हणजेच रु.१८८१.३४ लक्ष (रुपये अठरा कोटी एक्याऐशी लक्ष चौतीस हजार फक्त) इतका राज्य हिस्सा राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद केलेल्या योजना निहाय ६०% केंद्र हिश्श्यापोटी ४०% राज्य हिश्श्यापोटी नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१८-१९ साठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र | तपशिल | केंद्र /राज्य हिस्सा (रु.लाखात) | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पिय तरतुद | मागणी रक्कम (केंद्र ६०%/ राज्य हिस्सा ४०% ) |
| १ | आर-१ २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, सर्वसाधारण योजना<br>(०१)(१८) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान<br>(६० टक्के केंद्र हिस्सा) | २२१०F१५७ | ११३१८४.३६ | २८२२.००<br>(तिसरा हप्ता) |
| २ | आर-१ २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, सर्वसाधारण योजना<br>(०१)(१५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान<br>(४० टक्के राज्य हिस्सा) | २२१०५२४६ | ७११३३.९५ | १८८१.३४<br>(तिसरा हप्ता) |

५. वित्त विभागाच्या दिनांक २ एप्रिल, २०१८ सोबतच्या परिशिष्टामधील अनु.क्र.८ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटींची व शर्तीची पुर्तता होत असल्याचे संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांनी प्रस्तावासह सादर केलेल्या प्रमाणपत्राप्रमाणे प्रमाणित केले आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरिल निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येणार आहे असे प्रमाणित करण्यात येत आहे.

६. या संदर्भात वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

७. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ५३२/अर्थोपाय, दिनांक १० डिसेंबर, २०१८ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201901071451357217 असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Varsha Munjaji Bharose

Digitally signed by Varsha Munjaji Bharose
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f3096a175796cc670522c4aff97da20b708981b5122e87c8346c4cc7468f821, serialNumber=1bd844032884bbf2167bc99cd85325223aceef69d02bd455b7ca69724916 23e0, cn=Varsha Munjaji Bharose
Date: 2019.01.07 16:11:17 +05'30'

**( व.मुं. भरोसे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कु.क. कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग ( अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२.निवडनस्ती ( आरोग्य -७) .